मौजे आसोदा (ता.जि. जळगाव ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्र. ग्रापापु-२०१६/प्र.क्र. १२३/पापु ०९**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीख: २५ जानेवारी, २०१७**

**वाचा -**

१) ग्रामपंचायत आसोदा, ता.जि. जळगांव, यांचा ग्रामसभा ठराव क्र.२, दि. २/१०/२०१२.
२) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, नाशिक यांचे पत्र क्र. भानिकना/ तांशा/तां.मं./१२२/२०१६, दि. ४/८/२०१६.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/तांशा-१/ २८४/ २०१६, **दि.१७/१०/२०१६.**
४) ग्रामपंचायत आसोदा, ता.जि. जळगांव, ठराव क्र. २/६, दि. १/५/२०१६

**प्रस्तावना**

मौजे आसोदा (ता.जि. जळगाव ) नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ४,९०,३७,९७६/- (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्राम सभा ठरावान्वये मुळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी सदर योजनेच्या कामाच्या व्याप्तीत झालेल्या बदलामुळे खर्चात वाढ झाली. **अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, नाशिक यांनी** संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये प्रस्तुत योजनेच्या **रु. ५,६३,५२,५७५/-(ढोबळ)** किंमतीच्या प्रस्तावास सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. परिणामी, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव यांनी प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये शासनास सादर केला होता. तद्नुषंगाने प्रस्तुत योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

मौजे आसोदा (ता.जि. जळगाव ) या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु. ५,६३,५२,५७५/- (ढोबळ)** **(अक्षरी रुपये पाच कोटी त्रेसष्ठ लक्ष बावन्न हजार पाचशे पंच्याहत्तर फक्त)** एवढ्या

सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

## अटी

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित सर्व कामे ६ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत.

२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता आदेशामध्ये नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगांव यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणी पुरवठा योजना या देखाभाल दुरुस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे ( Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने ग्रामसभेच्या ठराव क्र. २/६, दिनांक १/५/२०१६ नुसार प्रथम रु. १२००/- इतकी पाणीपट्टी आकरण्यात यावी. त्यानंतर पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. ७३,१४,५९९/- (अक्षरी रुपये त्र्याहत्तर लक्ष चौदा हजार पाचशे नव्याण्णव फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. सदर आदेश ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२५१२२७४२११२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Dattatraya Fulsundar

Digitally signed by Vaishali Dattatraya Fulsundar
DN: CN = Vaishali Dattatraya Fulsundar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2017.01.25 13:41:26 +05'30'

**( वै.द. फुलसुंदर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, जळगांव.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.

११) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, नाशिक
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
१४) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,जळगांव.
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, जळगांव..
११) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगांव..
१२) अतिरिक्त मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी (कार्या-१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,१०,१३,१७,१८ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
१५) निवडनस्ती कार्यासन पापु-०९.